नागरी स्थानिक संस्थांमधील कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींच्या दाव्यांचा निपटारा करण्याकरीता तक्रार निवारण समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१७/प्र.क्र. १५७ /नवि-२०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २७ जून, २०१७.

**वाचा** :- १) मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्रमांक ७०३८/२०१३ (रत्नागिरी जिल्हा न्यायालयीन कर्मचारी (वर्ग-३) संघटना, रत्नागिरी विरूध्द महाराष्ट्र शासन) या न्यायालयीन प्रकरणात मा. उच्च न्यायालयाने १५.१०.२०१६ रोजी दिलेले आदेश

२) प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुबंई यांचे पत्र क्र. एचसीपी २०१६/प्र.क्र.१६४/का.६, दिनांक १२.०४.२०१७

**प्रस्तावना**:-

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या रिट याचिका क्रमांक ७०३८/२०१३ (रत्नागिरी जिल्हा न्यायालयीन कर्मचारी (वर्ग-३) संघटना, रत्पागिरी विरूध्द महाराष्ट्र शासन) या न्यायालयीन प्रकरणात मा. उच्च न्यायालयाने १५.१०.२०१६ रोजी दिलेल्या आदेशातील परिच्छेद क्र. ५ मध्ये खालीलप्रमाणे नमूद केले आहे:-

> “Therefore, even if a remedy before the Tribunal is provided, some grievance redressal mechanism prior to dispute being taken to judicial forum ought to be seriously thought of. This is in the greater interest of the Government and surely of immense public interest as such man-hours being wasted in the litigation are curtailed.”

२. मा. उच्च न्यायालयाचे उपरोक्त निदेशाच्या अनुषंगाने नगरपालिका, महानगरपालिका येथील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबींबाबतच्या दाव्यांचा जलद निपटारा करण्याच्या दृष्टीकोनातून स्वतंत्र तक्रार निवारण मंच स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त परिस्थितीत नागरी स्थानिक संस्थांमधील कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींच्या दाव्यांचा निपटारा करण्याकरीता विभागीय आयुक्त स्तरावर खालीलप्रमाणे तक्रार निवारण समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | संबंधित विभागीय आयुक्त | :- | अध्यक्ष |
| २) | संबंधित विभागीय आयुक्त कार्यालयातील प्रादेशिक उपसंचालक, नगरपरिषद प्रशासन | :- | सदस्य |
| ३) | संबंधित आयुक्त, महानगरपालिका / मुख्याधिकारी, नगरपरिषद यांनी प्राधिकृत केलेला अधिकारी | :- | सदस्य सचिव |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६२७१६०३४४०४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdbaa1d64146913669652db09801ad2747641d9f84fcf576e55f7050a8df530d, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.06.27 16:01:26 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
९) प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुबंई
१०) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई
१२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१३) सर्व विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी
१४) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१५) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायती (सर्व)
१६) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरचा शासन निर्णय विभागाच्या नागरीकांची सनदवर प्रसिध्द करण्यात यावा.
१७) निवडनस्ती (नवि-२०)